श्रीम. सायली रोहन जांभुळकर सहायक
अभियंता श्रेणी-१ (स्था) यांच्या ज्येष्ठता
दिनांकाबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : सअज्ये २०२५/प्र.क्र.१३/आ(संनि),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ७ मार्च, २०२५

संदर्भ : १) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.नियुक्ती -२०२३ /प्र.क्र.१४८/आ(संनि) दि.२६.०२.२०२४.
२) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये२०१६/(३३/१६)/आ(संनि) दि.०९.११.२०१६.
३) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. न्यायाप्र.२०२४/प्र.क्र.३८आ(संनि) दि.०३.०९.२०२४.
४) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये-२०१७/(५५/१७)/आ(संनि) दि.१३.११.२०१७.
५) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये -२०१८/(१३/१८)/आ(संनि) दि.०४.०४.२०१८.
६) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये -२०१९/प्र.क्र.१९/आ(संनि) दि.२२.०४.२०१९.
७) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये -२०२०/प्र.क्र.२६/आ(संनि) दि.१५.०२.२०२०.
८) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये -२०२१/प्र.क्र.०२/आ(संनि) दि.०२.०३.२०२१.
९) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये -२०२२/प्र.क्र.०२/आ(संनि) दि.१४.०३.२०२२.
१०) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सअज्ये -२०२३/प्र.क्र.१२/आ(संनि) दि.०९.०३.२०२३.

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र स्थापत्य अभियांत्रिकी सेवा मुख्य परीक्षा २०१३ मध्ये गुणवत्तेनुसार पात्र असुनही शिफारस न झाल्यामुळे श्रीम. सायली नितीन इनामके यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण औरंगाबाद येथे मुळ अर्ज क्र. ७४४/२०१५ दाखल केला होता. सदर अर्ज मा. न्यायाधिकरणाने दि.२ मार्च २०१६ रोजी निकाली काढला. सदर आदेशाविरुद्ध श्रीम. इनामके यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.१२५३२/२०१९ दाखल केली. सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दि.०५.०९.२०२३ रोजी दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने श्रीम.सायली रोहन जांभुळकर (सायली नितीन इनामके) यांची विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्था) या पदावर दि. २४.११.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शिफारस केली असून संदर्भ क्र.१ अन्वये श्रीम.सायली रोहन जांभुळकर यांना विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्था) पदावर नियुक्ती देण्यात आली आहे. श्रीम.सायली रोहन जांभुळकर यांच्या शिफारस पत्रामध्ये आयोगाने त्यांचे स्थान श्री.दीपक खंडू लांडगे (गु.क्र.१०५) यांच्या नंतर निश्चित केले आहे.

समांतर आरक्षण प्रकरणी न्यायालयीन निर्णयानुसार नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांची प्रकरणे ज्येष्ठतेबाबत अभिप्राय देण्यासाठी सामान्य प्रशासन विभागास सादर करण्यात आली होती. त्या अनुषंगाने जेष्ठतेबाबत विचाराधीन उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभागाने पुढीलप्रमाणे अभिप्राय दिले आहेत -

"ज्या उमेदवारांच्या बाबतीत मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयास अंतिम स्वरूप प्राप्त झाले आहे, त्या उमेदवारांच्या बाबतीत मा. न्यायालयाच्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी केल्याखेरीज अन्य पर्याय नाही. सबब जलसंपदा विभागाने मा.न्यायालयाच्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करणे अभिप्रेत आहे."

सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या उपरोक्त अभिप्रायास अनुसरून श्रीम.सायली रोहन जांभुळकर सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ यांची ज्येष्ठता महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा २०१३ मधील शिफारस केलेल्या उमेदवार श्री.दीपक खंडू लांडगे (गु.क्र.१०५), यांच्या नंतर दि. ०१.०१.२०१६ रोजी संदर्भ क्र.०३ येथील परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ४ ते १० येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या दि.१ जानेवारी रोजीच्या सन २०१७ ते २०२३ या कालावधीतील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्था) या संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठता सूचीमध्ये श्रीम.सायली रोहन जांभुळकर यांच्या नावाचा समावेश खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| सहायक अभियंता श्रेणी-१ यांचे नांव : **श्रीम.सायली रोहन जांभुळकर** | | | |
|---|---|---|---|
| नेमणुकीचा दिनांक : **२६.०२.२०२४** | | | |
| ज्येष्ठता सूची | अनुक्रमांक | ज्येष्ठता यादीतील क्रमानंतर | ज्येष्ठता यादीतील क्रमापूर्वी |
| १ | २ | ३ | ४ |
| ०१.०१.२०१७ | ४४४अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०१८ | ४४४अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०१९ | ४४४अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२० | ४४४अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२१ | ३१८अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२२ | ३१८अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२३ | ३१५अ | श्री. दीपक खंडू लांडगे यांच्या नंतर | श्रीम.कविता काशिनाथ कुंवर यांच्या पूर्वी |

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०३०७११५१५२३४२७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BAPUSAHEB RAMDAS SONAWANE

Digitally signed by BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=aa9f65e90f34e5648365a67ac974407846b2378509021d9a9b764788f91300c2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8D6647630D541B9030FF94EF31AFD6FA8B275E0E15A69D5F68163604468DC5D6, cn=BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
Date: 2025.03.07 11:52:44 +05'30'

**(बापूसाहेब सोनवणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीम. सायली रोहन जांभुळकर, सहायक अभियंता श्रेणी-१ (स्था), जलसंपदा विभाग.

प्रत :-

१) अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

४) सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख, जलसंपदा विभाग.

५) मा.मंत्री, जलसंपदा (गोदावरी आणि कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.

६) मा.मंत्री, जलसंपदा (विदर्भ, तापी व कोंकण विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.

७) सह सचिव (सेवा)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग,

८) कक्ष अधिकारी, कार्यासन आ(वर्ग-१)/आ(वर्ग-२).
जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

९) संग्रहार्थ/कार्यासन आ(संनि).